**विधान परिषदेच्या नाशिक व अमरावती पदवीधर मतदार क्षेत्रातील रिक्त पदांच्या पोटनिवडणूकांकरीता त्या क्षेत्रातील दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाट्यगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादी आस्थापनांमध्ये कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सुट्टी अथवा दोन तासांची सवलत देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक मतदान २०१७/प्र.क्र. १६ /कामगार ९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : ३० जानेवारी, २०१७.

**शासन परिपत्रक**

भारत निवडणूक आयोगाने नाशिक व अमरावतील पदवीधर मतदार क्षेत्रातील रिक्त पदांच्या निवडणुकांचा कार्यक्रम घोषित केला असून सदर क्षेत्रामध्ये दिनांक ३ फेब्रुवारी, २०१७ रोजी निवडणूक होणार आहे.

२. उपरोक्त निवडणूक क्षेत्रातील मतदारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी योग्य संधी प्राप्त करुन देण्याच्यादृष्टीने या क्षेत्रात कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी विशेष नैमित्तीक रजा मंजूर करण्याबाबत भारत निवडणूक आयोगाने व सामान्य प्रशासन विभागाने कळविले आहे.

३. या पार्श्वभूमीवर उपरोक्त मतदान क्षेत्रातील विविध दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाट्यगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादी आस्थापना यांना सूचना देण्यात येत आहेत की, आपल्या आस्थापनामधील पदवीधर मतदार म्हणून नोंदणी झालेल्या कामगारांना सदर निवडणूकीच्या दिवशी मतदानाचा हक्क बजावण्यासाठी भरपगारी सुट्टी (विशेष नैमित्तीक रजा) देण्यात यावी.

४. मतदानाच्या दिवशी वरील निवडणूक क्षेत्रात कामगारांच्या अनुपस्थितीमूळे धोका अथवा मोठ्या प्रमाणात नुकसान होईल अशा आस्थापनेतील/ उद्योगातील कामगारांना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या निर्यात व्यवसायात असलेल्या कंपन्या, कायम/ अखंडीत उत्पादन सुरु असलेल्या कंपन्यामधील पदवीधर मतदार म्हणून नोंदणी झालेल्या कामगारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी दोन तासांची सवलत देण्यात यावी.

५. सदर परिपत्रक सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २३/०१/२०१७ च्या टिप्पणीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर परिपत्रक निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१३०१४३७०२७७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha M Bharose

Digitally signed by Varsha M Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3e1fb27510d815dfa2ea1884eedb57e92914ff13c7358c095d3c03f9593e23d5, cn=Varsha M Bharose
Date: 2017.01.30 14:39:22 +05'30'

**(व. मुं. भरोसे)**
शासनाचे उप सचिव

**प्रत** - उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधीत आस्थापनांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह अग्रेषित

१. कामगार आयुक्त, बांद्रा, मुंबई ५१.
२. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, बांद्रा, मुंबई
३. संचालक, बाष्पके, बांद्रा, मुंबई
४. विभागीय आयुक्त, नाशिक/अमरावती
५. जिल्हाधिकारी, नाशिक/अमरावती
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
७. निवडनस्ती (कामगार ९)

प्रत माहितीसाठी :

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.